आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२३-२४ साठी शहरी भागात शबरी आदिवासी घरकुल योजनेसाठी निधी वितरीत करण्याबाबत.
(मुख्य लेखाशीर्ष - २२२५ डी २७१)

**महाराष्ट्र शासन**

**आदिवासी विकास विभाग**

**शासन निर्णय, क्रमांकः बीयुडी-२०२३/प्र.क्र.०२ /कार्यासन ६**

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२

दिनांक: - ३० मार्च, २०२४.

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३, दि.०८.१२.२०२३, दि.०५.०२.२०२४ व दि.०४.०३.२०२४.

२) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र.बीयुडी-२०२३/प्र.क्र.०२/कार्या-६, दि.०५.०६.२०२३, दि.२०.७.२०२३, दि.२८.११.२०२३ व दि.१५.०३.२०२४ व दि. २८.०३.२०२४

३) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र. आविवि-०२२३/प्र.क्र.३०/कार्या-८, दि. ११.०१.२०२४

४) शासन निर्णय, आदिवासी विकास क्र. आविवि-०२२४/प्र.क्र.२४/कार्या-८, दि. २०.०२.२०२४ व दि. १४.०३.२०२४

५) आदिवासी विकास विभागाची नस्ती क्र.आविवि-०४२३/प्र.क्र. ८१/का-०८.

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत राज्यातील शहरी भागातील अनुसूचित जमातीच्या ज्या लोकांना राहण्यासाठी स्वत:ची घरे नाहीत अथवा जे अनुसूचित जमातीचे लोक, कुडा मातीच्या घरात, झोपड्यांमध्ये किंवा तात्पुरत्या तयार केलेल्या निवाऱ्यात राहतात अशा अनुसूचित जमातीतील लाभार्थ्यांना शबरी आदिवासी घरकूल योजनेमधून अर्थसहाय्य उपलब्ध करुन देण्याबाबत संदर्भ क्र. ०३ येथील शासन निर्णयान्वये निर्णय घेण्यात आला आहे. या योजनेंतर्गत संदर्भ क्र. ४ येथील शासन निर्णयान्वये उद्दिष्ट निश्चित करण्यात येऊन त्याप्रमाणे निधी उपलब्ध करुन देण्याचे प्रस्तावित आहे. शहरी भागातील शबरी आदिवासी घरकुल योजनेंतर्गत सन २०२३-२४ या वर्षातील घरकुलांचे उद्दिष्ट पूर्ण करण्याकरीता सन २०२३-२४ च्या अर्थसंकल्पीत तरतुदींतून रु. ५०.०० कोटी इतका निधी वितरीत करण्याबाबत वित्त विभागास संदर्भाधीन क्र.५ येथील नस्तीद्वारा प्रस्ताव सादर करण्यात आला होता. सदर प्रस्तावास वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत मागणी क्र.टी-५ मधील मुख्य लेखाशीर्ष, २२२५ - अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण या मुख्य लेखाशीर्षाखाली शहरी भागात शबरी आदिवासी घरकुल योजनेकरीता सन २०२३-२४ या वर्षातील अर्थसंकल्पीत तरतुदींतून खालीलप्रमाणे निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे:-

(रु. लाखात)

| अ. क्र. | योजना व लेखाशिर्ष | बाब | जिल्हा | नियंत्रक अधिकारी तथा अपर आयुक्त आदिवासी विकास | आहरण व संवितरण अधिकारी तथा प्रकल्प अधिकारी, ए.आ.वि.प्र. | सदर शा.नि. अन्वये वितरीत करण्यात येत असलेली तरतूद |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | शबरी आदिवासी घरकुल योजना (२२२५डी२७१) | ३१- सहायक अनुदाने (वेतनेतर) | नागपूर | नागपूर | नागपूर | १६७६.०० |
| | | | वर्धा | | वर्धा | १५५.२० |
| | | | | | **एकूण** | **१८३१.२०** |
| २ | | | नंदुरबार | नाशिक | नंदुरबार | १२००.०० |
| | | | | | तळोदा | १२००.०० |
| | | | धुळे | | धुळे | ३१९.२० |
| | | | जळगाव | | यावल | २७४.४० |
| | | | | | **एकूण** | **२९९३.६** |
| ३ | | | धाराशिव | ठाणे | सोलापूर | ३५.२० |
| | | | कोल्हापूर | | घोडेगाव | १४०.०० |
| | | | | | **एकूण** | **१७५.२०** |
| **एकूण :-** | | | | | | **५०००.००** |

२. उपरोक्त प्रमाणे **रु.५०.०० कोटी (अक्षरी रुपये पन्नास कोटी फक्त)** इतका निधी योजनेचे नियंत्रक अधिकारी म्हणून संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे. त्यांनी वितरीत निधी सदर योजनेचे अंमलबजावणी अधिकारी म्हणून संबंधित प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प यांना अर्थसंकल्पीय निधी वितरण (BEAMS) प्रणालीवर तात्काळ वितरीत करावा.

३. सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ येथील शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करण्याची जबाबदारी संबंधित प्रशासकीय कार्यालयाची राहील.

४. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. त्या अनुषंगाने झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

५. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतुन फक्त अनुसूचित जमातीच्या लाभार्थ्यांना लाभ मिळेल याची दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित कार्यालयाची राहील.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.३७६/२४/व्यय-१४, दि. २८.०३.२०२४ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३२७१८२३०१९४२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJENDRA DEVARAM BHAWARI

Digitally signed by RAJENDRA DEVARAM BHAWARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=e2f5429d49742f96b79e4293421ba2dfa8a71cad3864b9b289879d173b67fcdc, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F617DED8E7182679ED107E63511160B2054D23D8173AD985E5B569A5802CEA5A, cn=RAJENDRA DEVARAM BHAWARI
Date: 2024.03.30 17:21:41 +05'30'

**(राजेंद्र दे.भवारी)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री (आदिवासी विकास), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. अपर मुख्य सचिव, ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई
३. सचिव, आदिवासी विकास विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
५. अपर आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, नाशिक/ नागपूर/ ठाणे
६. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नागपूर/ वर्धा/ नंदुरबार/ तळोदा/ धुळे/ यावल/ सोलापूर/ घोडेगाव
७. महानगरपालिका/ नगरपालिका/ नगरपंचायत- नागपूर/ रामटेक/ कन्हान/ पारशिवनी/ कांद्री/ हिंगणघाट/ समुद्रपूर/ सिंदी (रेल्वे)/ नंदुरबार/ नवापूर/ शहादा/ तळोदा/ धुळे/ साक्री/ शिंदखेडा/ शिरपूर/ जळगाव/ धाराशिव/ इचलकरंजी
८. संबधित कोषागार कार्यालय
९. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
१०.महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
११.अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.
१२.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१३.वित्त विभाग (कार्यासन-१९/ व्यय-१४), मंत्रालय, मुंबई-३२.
१४.कक्ष अधिकारी, कार्यासन-०८, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१५.निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.